**कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत 'अन्नधान्य पिकांकरीता' सन २०१५-१६ करीता अंतरीम प्रशासकीय मान्यता प्रदान करणे तसेच अभियानाकरीता ₹४९४७.४३ लाख निधी वितरीत करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
शासन निर्णय क्रमांक : राकृवि ०२१५/प्र.क्र. १५/राकृवियो कक्ष
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०१ ऑगस्ट, २०१५

वाचा:-

१. केंद्रीय कृषि मंत्रालयाचे पत्र - No. २०-१/२०१२-NFSM (CA-V) दि. १०/०४/२०१५
२. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३ दि. १७ /०४/ २०१५
३. केंद्रीय कृषि मंत्रालयाचे पत्र - F. No.CPS २-२१/२०१५-NFSM दि. ०६/०५/२०१५
४. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. असुअ कक्ष-२०१४/प्र.क्र.१/राकृवियो कक्ष दि.१९/०५/२०१४
५. केंद्रीय कृषि मंत्रालयाचे पत्र - No. २०-२७/२०१२-NFSM (CA-V) दि. २९/०५/२०१५
६. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१५/प्र.क्र.१११/अर्थ-३ दि. ३०/०६/२०१५
७. केंद्रीय कृषि मंत्रालयाचे पत्र - No. CPS 1-1/2015 - NFSM दि. ०९/०७/२०१५
८. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. संकीर्ण - २०१५/प्र.क्र.३४/कोषा.प्रशा-५ दि. २४/०७/२०१५

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान १०० % केंद्र पुरस्कृत अभियान म्हणून सन २००७-०८ पासून सन २०१४-१५ पर्यंत राबविण्यात येत होते तसेच, सन २०१३-१४ पर्यंत भात, गहु व कडधान्य पिकांकरीता केंद्र शासन अर्थसंकल्प बाहय तरतुदीतून सदर अभियानाकरीता राज्य शासनांना निधी उपलब्ध करुन देत असे. केंद्र शासनाने सन २०१४-१५ पासून अभियानांतर्गत भरडधान्य पिकांचा तसेच ऊस व कापूस या वाणिज्यीक पिकांवर आधारीत पिक पध्दतींचा समावेश केला तसेच, सदर अभियानाकरीता केंद्र शासन राज्य शासनांना अर्थसंकल्पीय तरतूदीद्वारे १००% निधी उपलब्ध करुन देत होते. त्यानुषंगाने सदर अभियानाच्या अंमलबजावणीस संदर्भांकित शासन निर्णय दि.१९/०५/२०१४ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर अभियांतर्गत समाविष्ट पिकांच्या उत्पादन व उत्पादकतेत वाढ करणे, शेत जमिनीची सुपीकता व उत्पादकता वाढविणे, रोजगारांची संधी निर्माण करणे व शेतक-यांच्या उत्पादनात वाढ करणे ही प्रमुख्य उद्दीष्ट आहेत.

सन २०१५-१६ पासून केंद्र शासनाने कृषि उन्नती योजनेच्या अंतर्गत राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान समाविष्ट केले असून सदर अभियान केंद्र व राज्याच्या ५०:५० अर्थसहाय्याने राबविण्याबाबत संदर्भांकित दि.१०/०४/२०१५ रोजीच्या पत्रान्वये अंतरीम प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे. त्यानुषंगाने केंद्र

शासनाने संदर्भांकित दि.०६/०५/२०१५ रोजीच्या पत्रान्वये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांसाठी (भात, गहू, कडधान्य व भरडधान्य) महाराष्ट्रास सन २०१५-१६ करिता एकूण ₹ २४४६१.९३४ लाख निधीच्या वार्षिक कृती आराखडयास मंजूरी दिली आहे. त्यानुसार चालू वर्षी राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांसाठी केंद्र व राज्याचा प्रत्येकी ₹ १२२३०.९६७ लाख आर्थिक सहभाग अपेक्षित आहे.

केंद्र शासनाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांकरीता राज्यास मंजूर केलेल्या वार्षिक कृती आराखडयापैकी केंद्र हिस्सा ₹ १२२३०.९६७ लाख रकमेपैकी पहिल्या हफ्त्यामध्ये ५०% म्हणजेच एकूण ₹ ६११५.४८ लाख निधी (सर्वसाधारण, अनुसूचित जाती व अनुसूचित जमातींकरीता) संदर्भांकित दि. २९ मे, २०१५ च्या पत्रान्वये वितरीत केला आहे. सद्यस्थितीत अनुसूचित जाती व जमातींकरीता स्वतंत्र लेखाशिर्ष घेण्याची कार्यवाही प्रगतीपथावर असून सर्वसाधारण प्रवर्गाकरीता ₹ ५००० लाख तरतूद उपलब्ध असून त्यापैकी ₹ ४९४७.४३ लाख वितरीत करणे शक्य आहे. त्याचप्रमाणे केंद्र शासनाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत केंद्र व राज्याच्या ५०:५० आर्थिक सहभागासह अंतरीम प्रशासकीय मान्यता प्रदान केली असून त्यानुषंगाने अभियानास राज्य शासनाची अंतरीम प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत तसेच, राज्यातील खरीप हंगामाच्या पार्श्वभूमीवर शासनास केंद्र शासनाने वितरीत केलेल्या निधीपैकी सद्यस्थितीत ₹ ४९४७.४३ लाख वितरीत करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णयः**

१. सन २०१५-१६ मध्ये कृषि उन्नती योजनेंतर्गत - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान - अन्नधान्य पिके या योजनेची केंद्र व राज्याच्या ५०:५० आर्थिक सहभागासह अंमलबजावणी करण्यास शासनाची अंतरीम प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर योजनेंतर्गत केंद्र व राज्याच्या आर्थिक सहभागामध्ये केंद्र शासनाने चालू वर्षी काही फेरबदल केल्यास सदर बदलानुसार योजनेची अंमलबजावणी करण्यात येईल तथापि, त्याबाबत स्वतंत्रपणे उचित आदेश निर्गमित करण्यात येतील.

२. सन २०१५-१६ करीता केंद्र शासनाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांकरीता राज्यास एकूण ₹ २४४६१.९३४ लाख रकमेच्या वार्षिक कृती आराखडयास मंजूरी प्रदान केली असून सदर आराखडयानुसार योजनेची अंमलबजावणी करण्यात यावी. चालू वर्षी मंजूर वार्षिक कृती आराखडयाचे पिकनिहाय / केंद्र: राज्य प्रमाणाचे विवरण पुढीलप्रमाणे -

(₹ लाख)

| अ.क्र. | राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत पिक | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
|---|---|---|---|---|
| १ | भात | १५२३.०४८ | १५२३.०४८ | ३०२६.०९६ |
| २ | गहू | २३७.७६०५ | २३७.७६०५ | ४७५.५२१ |
| ३ | कडधान्य | ९२२१.६५७५ | ९२२१.६५७५ | १८४४३.३१५ |
| ४ | भरडधान्य | १२५८.५०१ | १२५८.५०१ | २५१७.००२ |
| **एकूण** | | **१२२४०.९६७** | **१२२४०.९६७** | **२४४६१.९३४** |

३. केंद्र शासनाने कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत विहीत केल्याप्रमाणे अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती तसेच महिला शेतकरी लाभार्थ्यांना सदर योजनेंतर्गत लाभ देण्यात यावा.

४. दि. १९/०५/२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत राज्य स्तरावर, कृषि आयुक्तालय स्तरावर, विभागीय स्तरावर व जिल्हास्तरावर गठीत करण्यात आलेल्या समित्यांनी चालू वर्षी देखिल त्यांना विहीत केलेल्या जबाबदा-यांचे निर्वहन करावयाचे आहेत. सदर शासन निर्णयान्वये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत 'राज्य अभियान संचालक तथा सदस्य सचिव-राज्य स्तरीय अन्न सुरक्षा अभियान कार्यकारी समिती (SFSMEC)' म्हणून आयुक्त (कृषि) यांचे नामनिर्देशन करण्यात आले होते तथापि, या शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषि) यांच्या ऐवजी संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांचे सदर पदावर नामनिर्देशन करण्यात येत आहे.

५. सन २०१५-१६ करीता कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांकरीता सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र हिस्स्याचा एकूण ₹ ४९४७.४३ लाख निधी (रुपये एकोणपन्नास कोटी सत्तेचाळीस लाख त्रेचाळीस हजार फक्त) या शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषि), पुणे, यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे पिक निहाय व प्रवर्ग निहाय पुढीलप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

(₹ लाख)

| अ.क्र. | राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान अंतर्गत पिके | सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र हिस्याचा वितरीत निधी |
|---|---|---|
| १ | भात | ६१२.०२ |
| २ | गहु | ९६.१७ |
| ३ | कडधान्य | ३७३०.१७ |
| ४ | भरडधान्य | ५०९.०७ |
| **एकूण** | | **४९४७.४३** |

६. राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानाकरीता उपलब्ध करुन देण्यात आलेला केंद्र हिस्याचा ₹४९४७.४३ लाख (रुपये एकोणपन्नास कोटी सत्तेचाळीस लाख त्रेचाळीस हजार फक्त) निधी खालील लेखाशिर्षांतर्गत सन २०१५-१६ करिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

**मागणी क्रमांक डी-३**

२४०१- पीक संवर्धन

(००) (१०२) अन्नधान्य पिके

(००) (२५) राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान- भात/गहु/कडधान्य/भरड धान्य

(केंद्र हिस्सा) (१००% केंद्र पुरस्कृत योजना) (२४०१ ४६१४) (योजनांतर्गत) (दत्तमत)

३३, अर्थसहाय्य

७. या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानाकरीता उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या केंद्र हिस्याच्या ₹ ४९४७.४३ लाख रक्कमेचे जिल्हा निहाय/ कार्यालय निहाय वाटप करण्याकरीता संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांनी अभियानांतर्गत जिल्हा निहाय वाटप करावयाचा निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे विभागीय कृषि सह संचालकांमार्फत वितरीत करावा.

या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या ₹ ४९४७.४३ लाख निधीचे विविध कार्यालयांच्या स्तरावर कोषागारातून आहरण व वितरणाकरिता खालील अधिका-यांना त्या-त्या स्तरावर नियंत्रण अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे -

| अ.क्र. | कार्यालय | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १. | कृषि आयुक्तालय | संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे | सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे |
| २. | विभागीय सह संचालक (कृषि) | विभागीय सह संचालक (कृषि) | संबंधित विभागीय सह संचालक (कृषि) यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी |
| ३. | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी |
| ४. | तालुका कृषि अधिकारी | तालुका कृषि अधिकारी | तालुका कृषि अधिकारी |

८. केंद्रिय कृषि मंत्रालयाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत राज्य शासनास सन २०१५-१६ करीता संदर्भांकित दि. ६ मे, २०१५ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या प्रशासकीय मान्यतेनुसार, तसेच चालू वर्षी अभियानाकरीता मंजूर केलेल्या कृति आराखडयानुसार आणि वेळोवेळी केंद्रीय कृषि मंत्रालयाने दिलेल्या दिशानिर्देशानुसार सदर अभियानाची अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील, याबाबत संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी राज्यस्तरावरुन अभियानाचे संनियंत्रण करावे, त्याचप्रमाणे अभियानाच्या प्रभावी अंमलबजावणी व संनियंत्रणाकरीता वेळोवेळी अधिनस्त कार्यालयांना निदेशित करावे.

९. राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत विविध घटकांतर्गत लाभार्थी शेतकरी निवडतेवेळी अल्प व अत्यल्प भू-धारक शेतकऱ्यांना वा सदर शेतक-यांच्या गटांना प्राधान्य देण्यात यावे, त्याचप्रमाणे केंद्र शासनाने संदर्भांकित दि. ९/०७/२०१५ रोजीच्या पत्रान्वये अभियानांतर्गत ज्या घटकांखाली थेट लाभार्थ्यांच्या खाती अनुदान जमा करण्याचे (Direct Benefit Transfer) निदेशीत केले आहे त्या घटकांची चालू वर्षी केंद्र शासनाच्या निदेशानुसार अंमलबजावणी करण्यात यावी.

१०. संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकाऱ्यांनी/तालुका कृषि अधिकाऱ्यांनी अभियानाकरीता लाभार्थ्यांची निवड करुन अभियानांतर्गत समाविष्ट कार्यक्रम राबविण्याच्या दृष्टीने लाभार्थ्यांची यादी तालुका स्तरावर संकलित करावी. सदर यादीमध्ये शेतकऱ्याचे नांव, गांव, सर्वे/गट क्रमांक या बाबींसह, मोबाईल/दुरध्वनी क्रमांक, बँक खाते क्रमांक, आधार क्रमांक इ. पैकी किमान एका बाबीची

माहिती संकलित करण्यात यावी. त्याचप्रमाणे अभियानांतर्गत निवडण्यात आलेल्या लाभार्थ्यांची यादी निधी प्राप्त झाल्यापासून १५ दिवसांमध्ये कृषि विभागाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकाऱ्यांची राहील.

११. सदर लाभार्थ्यांच्या यादीनुसार सर्व लाभार्थी शेतकऱ्यांच्या शेतावर हाती घेण्यात आलेल्या कार्यक्रमाची प्रत्यक्ष तपासणी त्या-त्या गावातील कृषि सहायकांनी करावयाची असून, त्यांनी आपला अहवाल तालुका कृषि अधिकाऱ्यांमार्फत जिल्हा अधिक्षक कृषि अधिकाऱ्यांना सादर करावयाचा आहे. त्याचप्रमाणे, कृषि सहायकांचे अहवाल प्राप्त होताच सदर कार्यक्रमांतर्गत राबविण्यात आलेल्या कामांच्या पर्यवेक्षीय तपासणीचे उचित प्रमाण संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी मार्गदर्शक सूचनेमध्ये विहित करावे.

१२. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे. सदर उपयोगिता प्रमाणपत्राच्या आधारे अपर मुख्य सचिव (कृषि) यांच्या स्वाक्षरीने सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास निर्गमित करण्यात येईल.

१३. हा शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७.०४.२०१५ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०३१२१२१३५२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and adf, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2015.08.03 12:20:25 +05'30'

**(श्रीकांत चं. आंडगे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (कृषि व पणन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.

७. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
८. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
९. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१०.महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
११.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१३.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१४.सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१५.वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
१६.मा. मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१७.मा. राज्य मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१८. निवड नस्ती.